सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील सातारा सैनिक शाळेच्या घोडा देखभाल खर्चासाठीच्या निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः .सासैशा-२०१७/प्र.क्र.४६/एसएम-६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय , मुंबई ३२

तारीख: २९ मार्च ,२०१७

**<u>वाचा</u>** -

१) शासन परिपत्रक क्रमांकः पूरक २०१६/प्र.क्र.८९/ अर्थसंकल्प-३,वित्त विभाग, दिनांक २०/४/२०१६

२) शासन परिपत्रक क्रमांकः पूरक २०१६/प्र.क्र.१२८/ अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, दिनांक १२/८/२०१६

३) शिक्षण उपसंचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),संचालनालय,पुणे यांचे दिनांक २२/३/२०१७ चे पत्र.

**<u>प्रस्तावना</u>**-

सातारा सैनिकी शाळेची स्थापना दि. २३ जून १९६१ रोजी झाली असून सदर शाळा ही देशातील पहिली सैनिकी शाळा आहे. महाराष्ट्रातील तळागळातील व सर्व स्तरावरील गरीब व होतकरू मुलांना राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीच्या माध्यमातून भारतातून सैन्य दलात अधिकारी पदावर संधी मिळावी, हा या शाळेचा मुख्य उद्देश आहे. या शाळेतून मोठया प्रमाणावर विद्यार्थी राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीमध्ये आतापर्यंत भरती झाले आहेत.

सातारा सैनिक शाळेला सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी घोडा देखभालीसाठी एकूण रक्कम रू. १७,४२,०००/- इतक्या निधीची मागणी होती. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात सदर निधीतून घोडा देखभालीसाठी रू.७,२१,२००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित निधी रू.१०,२०,८००/- सन २०१६-१७ च्या उपलब्ध निधीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u>:-

"मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण,०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२ ०४६९), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी रू.४,४९,५३,०००/- इतकी तरतूद उपलब्ध आहे. उपलब्ध तरतूदीतून सातारा सैनिकी शाळेच्या घोडा देखभालीसाठी रू. १०,२०,८००/- ( रुपये दहा लाख वीस हजार आठशे फक्त )इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहायक संचालक (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक,शिक्षण संचालनालय,पुणे याना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणा-या निधीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. वित्त विभागाच्या दिनांक २०/४/२०१६ च्या परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

१.वित्त विभागाच्या दिनांक १७/४/२०१५ च्या परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहे.

२. या योजनेसाठी यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५ टक्के पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३. ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS व्दारे आंहरित करावी.

५. दिनांक २०/४/२०१६ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २० एप्रिल,२०१६ व दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२९१७२२२४७९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sangita Dinesh Shelke

Digitally signed by Sangita Dinesh Shelke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ace0ca0b129ab4da8f9e911057d75e7fbf6f6bd0b55e8f f7ca0deacfa15e1c0, cn=Sangita Dinesh Shelke
Date: 2017.03.30 19:22:38 +05'30'

**(संगिता शेळके)**

कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
३. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
६. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सातारा.
७. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
८. प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१०. वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
११. प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा
१२. सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१३. मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नर सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१४. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
१६. निवड नस्ती (एसएम-६)